पशुवैद्यकीय जैवपदार्थ निर्मिती संस्थेस राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत आदर्श उत्पादन पध्दतीचा (GMP) अवलंब करणे व संस्थेचे बळकटीकरण आणि आधुनिकीकरण करणे या प्रकल्पाअंतर्गत Strengthening and Modernization of Poultry and Viral Vaccine Production Laboratories या प्रयोगशाळा उभारणीकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक - पविआ-१०१८/प्र.क्र. ३५१ /पदुम-३,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२,
दिनांक :- ०२ फेब्रुवारी, २०१९.

वाचा:-१. कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शा.नि.क्र. पविआ- २०११/ प्र.क्र.४६५/पदुम-३,दि. २१.१.२०१३.
२. कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शा.नि.क्र. पविआ २०१३/ प्र.क्र.२३७/पदुम-३,दि. १.७.२०१३.
३. कृषि व पदुम विभाग क्र. आरकेव्ही-०५१८/सी.आर.१६२/१४-अे,दि.२७.८.२०१८ अन्वये दि. २५.७.२०१८रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण (राकृवियो विभाग) विभागाचे पत्र क्र.१- १५/ २०१८- राकृवियो, दि.५.११.२०१८.
५. कृषि विभागाचे पत्र क्र.राकृवि-०५१८/प्र.क्र.१६२/१४-अे, दि.११.१२.२०१८.

प्रस्तावना :-

वाचा क्र.१ येथील शासन निर्णय दि.१.०७.२०१३ अन्वये राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत पशुवैद्यकीय जैवपदार्थ निर्मिती संस्थेमध्ये आदर्श उत्पादन पध्दतीचा (GMP) अवलंब करणे, संस्थेचे बळकटीकरण व आधुनिकीकरण करणे या बाबीसाठी रु.५०४३.७४ लक्ष इतक्या निधीस प्रशासकीय मान्यता व वित्तीय मंजुरी प्रदान करण्यांत आलेली आहे. सदर प्रकल्प कार्यान्वित होत असतांना प्रकल्पाच्या पूर्वी निर्धारित केलेल्या जागेवर मेट्रो स्थानकाचे आरक्षण आल्यामुळे प्रकल्पाची मूळ जागा बदलून नवीन जागेवर बांधकाम सुरु करण्यांत आले. त्यामुळे बांधकामाच्या प्लीन्थच्या उंचीमध्ये तसेच बांधकामाच्या निविदेतील काही बाबींचे प्रमाण अधिक (Extra Items) होणार असल्याने अतिरिक्त अंदाजपत्रक रु.११२६.२१ लक्ष सादर करण्यांत आले होते. त्यामुळे प्रकल्पाची सुधारित किंमत रु.६१६९.९५ लक्ष इतकी झाली आहे. सुधारीत प्रकल्पाची किंमत व त्या अनुषंगाने येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय:-

पशुवैद्यकीय जैवपदार्थ निर्मिती संस्थेस राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत आदर्श उत्पादन पध्दतीचा (GMP) अवलंब करणे व संस्थेचे बळकटीकरण आणि आधुनिकीकरण करणे या प्रकल्पाअंतर्गत Strengthening and Modernization of Poultry and Viral Vaccine Production Laboratories या प्रयोगशाळा उभारणीकरिता सादर

करण्यात आलेल्या सुधारित अंदाजपत्रकाप्रमाणे येणाऱ्या रु.११२६.२१ लक्ष इतक्या अतिरिक्त खर्चास राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या दि.२५.०७.२०१८ रोजी झालेल्या २५ व्या बैठकीत तत्वत: मान्यता प्रदान करण्यांत आली व प्रकल्पास केंद्र शासनाचे अभिप्राय प्राप्त करुन घेण्याचे निर्देश देण्यांत आले होते.

२. वाचा क्र.३ येथील केंद्र शासनाच्या दिनांक ५.११.२०१८ च्या पत्रान्वये सदर प्रकल्पास अतिरिक्त रक्कम रु.११२६.२१ लक्ष यास केंद्र शासनाप्रमाणे मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार दि.११.१२.२०१८ अन्वये प्रकल्पांतर्गत अतिरिक्त रक्कम रु.११२५.०० लक्ष यास राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार ५ टक्के मर्यादेपर्यन्त प्रोजेक्ट मॅनेजमेन्ट कन्सल्टन्सी चार्जेस अदा करण्याच्या अटीस अधिन राहून प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यास मान्यता प्रदान केलेली आहे.

३. या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्पांतर्गत सुधारित अंदाजपत्रकानुसार येणारा जादा खर्च रु.११२५.०० लक्ष यास शासनाची प्रशासकीय व वित्तीय मंजुरी प्रदान करण्यांत येत आहे. प्रकल्पाची मूळ किंमत रु.५०४३.७४ व प्रकल्पांतर्गत येणारा जादा खर्च रु.११२५.०० लक्ष असे एकूण प्रकल्पाची सुधारित किंमती रु.६१६८.७४ लक्ष यास मान्यता प्रदान करण्यांत येत आहे. प्रकल्पाचे आर्थिक निकष खालीलप्रमाणे राहतील. या प्रकल्पांतर्गत खालीलप्रमाणे बाबनिहाय खर्चाच्या मानकास मान्यता प्रदान करण्यांत येत आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशील | दि.१.०७.२०१३ च्या शा.नि. नुसार किंमत रु. | सुधारित अंदाजपत्रकाप्रमाणे किंमत रु. | एकूण किंमत रु. |
|---|---|---|---|---|
| १. | विषाणू लस निमिती प्रयोगशाळेचे आदर्श उत्पादन पध्दतीनुसार संपूर्ण टर्न की पध्दतीने नवीन इमारतीचे बांधकाम अनुषंगिक यंत्रसामुग्री व साधन सामुग्रीसह. | **२०१६.२२** | **२२७.७१** | **२२४३.९३** |
| २. | कुक्कुट लस निमिती प्रयोगशाळेचे आदर्श उत्पादन पध्दतीनुसार संपूर्ण टर्न की पध्दतीने नवीन इमारतीचे बांधकाम अनुषंगिक यंत्रसामुग्री व साधन सामुग्रीसह | **२६५९.७५** | **३६९.४५** | **३०२९.२०** |
| ३ | प्रोजेक्ट मॅनेजमेन्ट कन्सल्टटन्सी (दोन्ही प्रयोगशाळांसाठी ) ७ टक्के अधिक सर्व्हिस टॅक्स @१२.३६ टक्के व ईतर सर्व अनुषंगिक बाबींवर होणारा खर्च | **३६७.७७** | **५२७.८४** | **८९५.६१** |
| | एकूण - | **५०४३.७४** | **११२५.००** | **६१६८.७४** |

५. सदरचा प्रकल्प हा पूर्णत: टर्न की तत्वावर सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत राबविण्यास या शासन निर्णयाद्वारे दिनांक १.७.२०१३ रोजीच्या शासन निर्णयामधील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे. उर्वरित अटी व शर्ती या शासन निर्णय दि.२१.१.२०१२ मध्ये नमूद केल्यानुसार कायम राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक २०१९०२०५१५०५५६८३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2019.02.05 15:07:23 +05'30'

**( विकास तु.कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.
२. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७.
४. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुवैद्यकीय जैवपदार्थ निर्मिती संस्था, पुणे.
५. उप सचिव (राकृवियो) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
६. महालेखापाल, मुंबई/नागपूर (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण).
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
९. निवड नस्ती पदुम-३.